महा-रेशीम अभियान -२०२०
**तुती/टसर क्षेत्र नोंदणी कार्यक्रम दि.०७ जानेवारी, २०२० ते दि.२१ जानेवारी, २०२० या कालावधीत राबविणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

**शासन निर्णय क्रमांकः केंपूयो १०१९/ प्र.क्र.१२६/रेशीम कक्ष**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२

**दिनांक : २६ डिसेंबर, २०१९**

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण २०१७/ प्र.क्र.६/ टेक्स-५, दि.१५.०२.२०१८.
२) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. प्रावियो १०१८/ प्र.क्र.११८/ रेशीम कक्ष, दि.१२.१२.२०१८.
३) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रे/ कार्या-८/ महा रेशीम अभि-२०२०/ राबविणे/१९/ ११७०, दि.१९.११.२०१९.
४) संचालक (रेशीम) यांचे पत्र क्र. रे/ कार्या-८/ महा रेशीम अभि-२०२०/ राबविणे/१९/ १२९४, दि.०६.१२.२०१९.

प्रस्तावना :-

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण, २०१८-२३ हे संदर्भाधीन दि.१५ फेब्रुवारी, २०१८ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे जाहिर करण्यात आले आहे. रेशीम उद्योग हा कृषि व वन संपत्तीवर आधारीत रोजगाराची प्रचंड क्षमता असलेला उद्योग आहे. महाराष्ट्रातील हवामान या उद्योगास पोषक असल्यामुळे रेशीम उत्पादन करण्यास राज्यात भरपूर वाव आहे. राज्याच्या कृषि विकास दर वृद्धीबरोबर ग्रामीण भागातील जनतेचा आर्थिक स्तर व जीवनमान उंचावण्यास मदत करणारा हा उद्योग आहे. परंतु, शेतकऱ्यांना या उद्योगाची परिपूर्ण माहिती नसल्यामुळे राज्यातील शेतकरी मोठ्या प्रमाणात या उद्योगाकडे वळलेले दिसून येत नाहीत. ही बाब लक्षात घेऊन सन २०१८-२३ या वस्त्रोद्योग धोरणाच्या कालावधीत रेशीम उद्योगाला राज्याच्या अर्थव्यवस्थेत केंद्रस्थानी आणण्यासाठी अनेक उपाययोजना हाती घेण्याचे उद्दिष्ट ठेवण्यात आले आहे. नवीन तुती लागवड करण्यासाठी शेतकऱ्यांची नोंदणी करण्याकरिता प्रत्येक वर्षी डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था (बार्टी), पुणे या संस्थेच्या सहकार्याने महारेशीम अभियान राबविण्यात येईल असे वस्त्रोद्योग धोरणात नमूद आहे. महारेशीम अभियान-२०१९ ला राज्यात उत्स्फुर्त प्रतिसाद मिळाला असून रेशीम शेतीची प्रचार व प्रसिद्धी होवून रेशीम उद्योग लोकाभिमुख होण्यास मदत मिळाली आहे. त्या अनुषंगाने संचालक (रेशीम) यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार "महारेशीम अभियान-२०२०" राबविण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

राज्यातील रेशीम शेतीचे महत्त्व व त्यातून मिळणाऱ्या हमखास व शाश्वत उत्पन्नाची शेतकऱ्यांना माहिती व्हावी याकरिता प्रचार व प्रसिद्धी करण्यासाठी तसेच, सन २०२० मध्ये तुती लागवड व टसर रेशीम लाभार्थ्यांची नाव नोंदणी करण्यासाठी दि. ०७ जानेवारी, २०२० ते दि. २१ जानेवारी, २०२० या कालावधीत राज्यात “महारेशीम अभियान-२०२०” राबविण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. “महारेशीम अभियान-२०२०” राबविण्यासाठी संदर्भाधीन दि.१२ डिसेंबर, २०१८ रोजीच्या शासन निर्णयाद्वारे गठीत केलेल्या समित्या, अभियान राबविण्यासाठीच्या मार्गदर्शक सुचना व कार्यपद्धती जशास तशा लागू राहतील.

३. सदर महारेशीम अभियानाकरिता आवश्यक निधी विविध मंजूर योजनामधील प्रशिक्षण, मेळावे, प्रचार व प्रसिद्धी या बाबींकरिता उपलब्ध असलेल्या निधीतून विहीत मर्यादेच्या व वित्तीय अधिकार नियमाच्या अधिन राहून खर्च करण्याची जबाबदारी संचालक (रेशीम) यांची राहील.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९१२२६१७२०३२७१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Kishor Daulat Patil

Digitally signed by Kishor Daulat Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co Operation Marketing and Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d62fbb023999c9d217eee24b15e7b99adc0cdc4a7188393583aa1bbab889b6a8, serialNumber=4acebae058f9790422d1385b04baa7b606c3951ca0fde91204ace3bb2ee4b2c5, cn=Kishor Daulat Patil
Date: 2019.12.26 17:27:08 +05'30'

**( किशोर पाटील )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२) मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
३) महाराष्ट्रातील सर्व सन्माननीय संसद सदस्य,
४) महाराष्ट्रातील सर्व सन्माननीय विधानसभा/ विधान परिषद सदस्य,
५) अपर मुख्य सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
६) प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई

८) सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
९) सचिव (ग्रामविकास), ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सचिव (रोहयो), मंत्रालय, मुंबई
११) सर्व विभागीय आयुक्त,
१२) प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१३) आयुक्त, महात्मा गांधी राष्ट्रीय ग्रामीण रोजगार हमी योजना, नागपूर
१४) सर्व जिल्हाधिकारी
१५) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१६) संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, नागपूर.
१७) महासंचालक, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१८) प्रकल्प संचालक, समतादूत कक्ष, डॉ. बाबासाहेब आंबेडकर संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे
१९) सर्व उप संचालक/ सहायक संचालक (रेशीम), नागपूर/ अमरावती/ पूणे/ औरंगाबाद
२०) सर्व रेशीम विकास अधिकारी, श्रेणी/१-श्रेणी-२, जिल्हा रेशीम कार्यालय
२१) विधानमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई
२२) रेशीम कक्ष निवडनस्ती.

***************************